**सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी समग्र शिक्षा अभियान (सर्व शिक्षा अभियान) कार्यक्रमासाठी पहिल्या हप्त्याचा अनावर्ती (Capital) निधी (सर्वसाधारण हिस्सा) वितरीत करणेबाबत (केंद्र व राज्य हिस्सा).**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएसए-२०१८/प्र.क्र.१५० भाग-१/एस.डी-१**
मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १९ डिसेंबर, २०१८

वाचा -

१) शालेय शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक पीआरई-२०००/(२७४०)/प्राशि-१, दि. १८/०१/२००२
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२/०४/२०१८
३) केंद्र शासन, मनुष्यबळ विकास मंत्रालय, नवी दिल्ली आदेश क्रमांक : ७-१/२०१८-IS-१२ (GEN), दिनांक २९/१०/२०१८
४) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे पत्र क्र.मप्राशिप /लेखा-२/केंद्र-राज्य निधी मागणी/२०१८-१९/३०९०, दि.०१/१२/२०१८

**प्रस्तावना-**

समग्र शिक्षा अभियान (सर्व शिक्षा अभियान) योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण (केंद्र : राज्य) ६०:४० असे आहे. केंद्र शासनाने दिनांक २९/१०/२०१८ रोजीच्या आदेशान्वये केंद्र शासनाचा पहिल्या हप्त्याचा अनावर्ती (Capital) (सर्व साधारण हिस्सा) रु.२३,०८,८६,०००/- (रुपये तेवीस कोटी आठ लाख शहाऐंशी हजार फक्त) इतका निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेला आहे. समग्र शिक्षा अभियान योजनेसाठी केंद्र शासनाने संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेला निधी व सदर निधीच्या प्रमाणात राज्य हिस्याचा निधी मंजूर करण्याचा प्रस्ताव राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याचे वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र.५२८/अर्थोपाय, दि.१२/१२/२०१८ अन्वये अभिप्राय दिले आहेत. सदर निधीच्या प्रमाणात राज्य हिस्सा (सर्वसाधारण) रु.१५,३९,२४,०००/- (रु.पंधरा कोटी एकोणचाळीस लाख चोवीस हजार फक्त) इतका येतो. केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला केंद्र हिस्स्याचा निधी (सर्व साधारण) रु.२३,०८,८६,०००/- (रुपये तेवीस कोटी आठ लाख शहाऐंशी हजार फक्त) व त्याप्रमाणात राज्य हिस्सा (सर्व साधारण) रु.१५,३९,२४,०००/- (रु.पंधरा कोटी एकोणचाळीस लाख चोवीस हजार फक्त) असा एकूण रु.३८,४८,१०,०००/- (रुपये अडतीस कोटी अठ्ठेचाळीस लाख दहा हजार फक्त) निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

**शासन निर्णय-**

समग्र शिक्षा अभियान (सर्व शिक्षा अभियान) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाकरिता "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ८००-इतर खर्च (००) (१२) सर्व शिक्षा अभियान (केंद्र हिस्सा), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२०२ I०४९)" करिता एकूण रुपये १२६३.२७ कोटी तरतूद अर्थसंकल्पित आहे. तर त्यास समवर्ती राज्य हिस्सा म्हणून "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ८००-इतर खर्च, (००) (००) (०५) सर्व शिक्षा अभियान (केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा), (२२०२ ३०४७), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" करिता एकूण रु.४०० कोटी तरतूद अर्थसंकल्पित आहे.

२. केंद्र शासनाने समग्र शिक्षा अभियान योजनेकरिता उपलब्ध करुन दिलेला पहिल्या हप्त्याचा अनावर्ती (Capital) (सर्व साधारण) निधी रु.२३,०८,८६,०००/- (रुपये तेवीस कोटी आठ लाख शहाऐंशी हजार फक्त) व त्याप्रमाणात राज्य हिस्सा निधी (सर्व साधारण) रु.१५,३९,२४,०००/- (रु.पंधरा कोटी एकोणचाळीस लाख चोवीस हजार फक्त) असा एकूण रु.३८,४८,१०,०००/- (रुपये अडतीस कोटी अठ्ठेचाळीस लाख दहा हजार फक्त) इतका निधी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्याकडे समग्र शिक्षा अभियान कार्यक्रमाच्या (सर्व शिक्षा अभियान) अंमलबजावणीसाठी या आदेशान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

वरीलप्रमाणे वितरीत करण्यात आलेला रु.२३,०८,८६,०००/- (रुपये तेवीस कोटी आठ लाख शहाऐंशी हजार फक्त) इतक्या निधीचा खर्च "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ८००-इतर खर्च (००) (१२) सर्व शिक्षा अभियान (केंद्र हिस्सा), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२०२ I०४९)" व रु.१५,३९,२४,०००/- (रु.पंधरा कोटी एकोणचाळीस लाख चोवीस हजार फक्त) इतक्या निधीचा खर्च "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ८००-इतर खर्च, (००) (००) (०५) सर्व शिक्षा अभियान (केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा), (२२०२ ३०४७), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. वित्त विभागाच्या दि.०२/०४/२०१८ रोजीच्या परिपत्रकात नमूद केलेल्या सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरित केलेला निधी केंद्र शासनाचे दि.२९/१०/२०१८ रोजीच्या आदेशामध्ये दिलेल्या निदेशानुसार व सन २०१८-१९ च्या वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रक प्रकल्प मान्यता मंडळाने (PAB) मंजूर केलेल्या समग्र शिक्षा अंतर्गत कार्यक्रमांच्या भांडवली मत्ता निर्माण करणाऱ्या अनावर्ती बाबीसाठी खर्च करावा.

५. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०२/०४/२०१८ च्या शासन परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव / कक्ष अधिकारी (रोख शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण

अधिकारी" तर सह सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०२/०४/२०१८ च्या शासन परिपत्रकान्वये, वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र.५२८/अर्थोपाय, दि.१२/१२/२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२१९१५५५३६०१२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Umeshrao Gaikwad

Digitally signed by Santosh Umeshrao Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc, serialNumber=bc8833f9e213a7e4dfb9d2b071c9202ea52a04054e53b0c1bbf9e50c90a2cf5c, cn=Santosh Umeshrao Gaikwad
Date: 2018.12.19 16:02:45 +05'30'

**(संतोष गायकवाड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
३) मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
५) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
८) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ६३
९) सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
१०) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
११) सह सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) वित्त विभाग, (व्यय-५ / अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१३) अवर सचिव / कक्ष अधिकारी, रोख शाखा, अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग , मंत्रालय, मुंबई
१४) निवड नस्ती (एस.डी.१)